**प्रादेशिक परिवहन अधिकारी व**
**उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची**
**नवीन कार्यालयांची निर्मिती करण्याबाबत.**
नविन पद निर्मिती व अनुषंगिक खर्चास मंजूरी.

**महाराष्ट्र शासन,**
**गृह विभाग.**
**शासन निर्णय क्रमांक: एमव्हीडी-१२०३/सीआर- १५८/परि-४,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १ ऑक्टोबर, २००३.**

वाचा : परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.संकिर्ण-४६०३/का.८(१)/ कॅबिनेट/ जा.क्र.५००९, दिनांक- ११/४/२००३.

**शासन निर्णय** : राज्याची भौगोलिक परिस्थिती आणि वाढती वाहनसंख्या विचारात घेता राज्यात काही नवीन प्रादेशिक परिवहन अधिकारी व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची कार्यालये सुरु करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार नांदेड, धुळे व नागपूर (ग्रामीण) येथे प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची कार्यालये तसेच मालेगांव, जिल्हा नाशिक, बारामती, जिल्हा पुणे व नवी मुंबई (वाशी) येथे उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची कार्यालये सुरु करण्यास शासनाची परवानगी देण्यात येत आहे.

१) प्रादेशिक परिवहन अधिकारी, नांदेड :- प्रादेशिक परिवहन अधिकारी, नांदेड या कार्यालयाच्या परिक्षेत्रात नांदेड, लातूर, परभणी व हिंगोली हे जिल्हे राहतील. या कार्यालयासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे कर्मचारी वर्ग मंजूर करण्यात येत आहे.

२) प्रादेशिक परिवहन अधिकारी, धुळे :- प्रादेशिक परिवहन अधिकारी, धुळे या कार्यालयाच्या परिक्षेत्रात धुळे, जळगांव व नंदूरबार हे जिल्हे राहतील. या कार्यालयासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे कर्मचारी वर्ग मंजूर करण्यात येत आहे.

३) प्रादेशिक परिवहन अधिकारी, नागपूर (ग्रामीण) :- प्रादेशिक परिवहन अधिकारी, नागपूर (ग्रामीण) या कार्यालयाच्या परिक्षेत्रात नागपूर (ग्रामीण,)(नागपूर महानगरपालिका क्षेत्र वगळून), चंद्रपूर, गडचिरोली, गोंदिया व भंडारा हे जिल्हे राहतील. या कार्यालयासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे कर्मचारी वर्ग मंजूर करण्यात येत आहे.

४)     उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, मालेगांव :- उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, मालेगांव या कार्यालयाच्या परिक्षेत्र मालेगांव, बागलण, देवळा, कळवण व नांदगांव तालुका, जिल्हा नाशिक असे राहील. या कार्यालयासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे कर्मचारी वर्ग मंजूर करण्यात येत आहे.

५)     उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, बारामती :- उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, बारामती या कार्यालयाचे परिक्षेत्र बारामती, इंदापूर व दौंड तालुका, जिल्हा पुणे असे राहील. या कार्यालयासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे कर्मचारी वर्ग मंजूर करण्यात येत आहे.

६)     उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, वाशी, नवी मुंबई :- उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, वाशी, नवी मुंबई या कार्यालयाचे परिक्षेत्र नवी मुंबई महानगरपालिका, उरण तालुका, जिल्हा रायगड आणि जवाहरलाल नेहरु पोर्ट ट्रस्ट क्षेत्र असे राहील. या कार्यालयासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे कर्मचारी वर्ग मंजूर करण्यात येत आहे.

२.     या व्यतिरिक्त या सहा कार्यालयांकरिता आवश्यक असणारा अधिकारी/ कर्मचारी वर्ग इतर कार्यालयातून समायोजित करण्यास परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३.     प्रादेशिक परिवहन अधिकारी, नांदेड, धुळे, नागपूर (ग्रामीण), उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, मालेगाव, बारामती व नवी मुंबई यांना कार्यालय प्रमुख तसेच स्वत:करीता व त्यांच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या कर्मचा-यांकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून मुंबई वित्तिय नियमावली, १९५९ मध्ये नमूद केलेल्या अधिकारांचा ते वापर करु शकतील. या नवनिर्मित कार्यालयांकडे वर्ग करण्यात आलेल्या अधिकारी/ कर्मचारीवृंदाचा वेतन व भत्ते यावरील खर्च भागवता यावा या दृष्टीने परिवहन आयुक्त यांनी संबधित मुळ कार्यालयाकरीता सन २००३-२००४ या वर्षाकरिता उपलब्ध करुन दिलेली आर्थिक तरतुद त्या प्रमाणात नवीन कार्यालयाकडे वर्ग करावी. तसेच परिवहन आयुक्त यांनी ही नवीन कार्यालये सुरु करणेबाबत तातडीने कार्यवाही करावी.

४.     सदर ६ कार्यालय सुरू करण्याकरीता येणारा खर्च हा लेखाशीर्ष "२०४१, वाहनावरील कर, ००१ संचालन व प्रशासन- (०२)प्रादेशिक कार्यालये (०२)(०१) प्रादेशिक कार्यालये- दत्तमत (योजनेतर)

(२०४१००३६)" या लेखाशीर्षाखाली प्रथमतः शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक आकनि ११.०३/६८ /अर्थसंकल्प-१०, दि. १ .१०.२००३ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या रूपये १,००,०००/- (रूपये एक लाख फक्त) आकस्मिकता निधी अग्रिमातून भागविण्यात यावा. हा खर्च सदर लेखाशीर्षाखालील पुढील उददीष्टाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| **आवर्ती खर्च** | **उद्दीष्ट** |
|---|---|
| वेतन | ०१ वेतन |
| कार्यालयीन जागेचे भाडे | ०७ भाडेपटटी व कर |
| किरकोळ खर्च | ०५ कार्यालयीन खर्च |

५. यासंबंधीचे देयके सादर करताना त्यावर लाल शाईने सदर खर्च आकस्मिकता निधीतून करण्यात आला आहे अशी नोंद घेण्यात यावी. व सदर प्रकरणी पुरक अनुदान प्राप्त झाल्यावर तो मागणी क्र.बी-३, "२०४१ वाहनावरील कर ००१ संचालन व प्रशासन -(०२) प्रादेशिक कार्यालये-(०२) (०१) प्रादेशिक कार्यालये-दत्तमत (योजनेतर ) (२०४१००३६)" या लेखाशीर्षाखाली अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा. रु. एक लाख मंजूर केलेला अग्रिम हा प्रादेशिक परिवहन अधिकारी / उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची कार्यालये सुरु करणे, २० वायुवेग पथके सुरु करणे व ६ सीमा तपासणी नाके सुरु करणे याकरिता आहे.

६. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी वरील मंजूरीप्रमाणे आकस्मिकता निधी अग्रिम रकमेतून खर्च करण्यासाठी देयके सादर करण्यासंदर्भात पुढील सूचना काटेकोरपणे पाळण्याबाबत कळवावे.

१) आकस्मिकता निधीतून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिका-याकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात आगाऊ रक्कमेतून खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकावर "आकस्मिकता निधी अग्रिम, शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांकः आकनि-११.०३/६८/अर्थसंकल्प-१०, दिनांक १ ऑक्टोबर, २००३ संगणक सांकेतांक ८०००- ०६७-७ अन्वये मंजूर" असे लाल शाईने लिहावे अशी सूचना आदेशात अंतर्भूत करावी व ही सूचना लाल शाईने अधोरेखित करावी.

२) आकस्मिकता निधी अग्रिम रकमेतून खर्च करण्यासाठी वेगळी देयके सादर करावीत.

३) देयकावर जोडलेल्या संगणक चिठठीवर अर्थसंकल्प शीर्षाचा कोड नंबर लिहिण्यात यावा.

४) वित्त विभाग परिपत्रक क्रमांक: सीएनएफ-१०८६/१५३/अर्थ-३, दिनांक २८.८.१९८६ अन्वये आकस्मिकता निधीमधील आगाऊ रकमेबाबत दिलेल्या आदेशाचे काटेकोरपणे पालन करावे.

५) आकस्मिकता निधीतून अग्रिमातून करावयाच्या खर्चासंबंधी . देयके काढताना संगणक सांकेताकचा वापर करावा.

७. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी वरील मंजूरीप्रमाणे आकस्मिकता निधीतून अग्रीम रक्कम खर्च करताना ज्या कारणासाठी तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे त्याच कारणासाठी पूर्णपणे खर्च करावी ते याकरिता पूर्णपणे जबाबदार राहतील. तसेच सदरहू अग्रिमातून प्रत्यक्ष खर्च केल्याची माहिती त्यांनी शासनास दिनांक १५.१२.२००३ पूर्वी अवगत करावी.

६. हा निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर ९२८/२००३/व्यय-८, दिनांक २९.९.२००३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्र.कृ. सगदेव)
उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग

प्रति,

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी,
सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,
महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल, लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, ५ वा मजला,
नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, नांदेड, धुळे, पुणे, नाशिक, ठाणे.
वित्त विभाग, (व्यय-८/अर्थसंकल्प-३ /अर्थसंकल्प-१०/वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अर्थसंकल्प-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमव्हीडी१२०३/ प्रक्र. १५८ , दिनांक १.१०.२००३ चे प्रपत्र

## प्रादेशिक परिवहन अधिकारी, नांदेड कार्यालय येथे निर्माण करावयाच्या पदांचा तपशील

| | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | प्रादेशिक परिवहन अधिकारी | १०,०००-३२५-१५,२०० | १ |
| २ | सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी | ६५००-१७५-१०,५०० | १ |
| ३ | मोटार वाहन निरीक्षक | ५५००-१७५-९००० | २ |
| ४ | सहायक मोटार वाहन निरीक्षक | ५०००-१५०-८००० | २ |
| ५ | मुख्य लिपिक (ग्रामीण) | ५०००-१५०-८००० | २ |
| ६ | वरीष्ठ लिपिक | ४०००-१००-६००० | २ |
| | एकूण | | १० |

## प्रादेशिक परिवहन अधिकारी,धुळे कार्यालय येथे निर्माण करावयाच्या पदांचा तपशील

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | प्रादेशिक परिवहन अधिकारी | १०,०००-३२५-१५,२०० | १ |
| २ | सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी | ६५००-१७५-१०,५०० | १ |
| ३ | मुख्य लिपिक (ग्रामीण) | ५०००-१५०-८००० | २ |
| ४ | कनिष्ठ लेखा परिक्षक | ५०००-१५०-८००० | १ |
| | एकूण | | ५ |

## प्रादेशिक परिवहन अधिकारी,नागपूर कार्यालय येथे निर्माण करावयाच्या पदांचा तपशील

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | प्रादेशिक परिवहन अधिकारी | १०,०००-३२५-१५,२०० | १ |
| २ | उप प्रादेशिक परिवहन अधिकारी | ७,४५०-३२५-११,५०० | १ |
| ३ | मुख्य लिपिक (ग्रामीण) | ५,०००-१५०-८,००० | २ |
| ४ | कनिष्ठ लेखापरीक्षक | ५,०००-१५०-८,००० | १ |
| ५ | वरीष्ठ लिपिक | ४,०००-१००-६,००० | २ |
| ६ | वाहन चालक | ३०५०-७५-३९५०-८०-४,५९० | १ |
| ७ | स्वच्छक | २,५५०-५५-२६६०-६०-३,२०० | १ |
| ८ | पहारेकरी | २,५५०-५५-२६६०-६०-३,२०० | १ |
| | एकूण | | १० |

उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,मालेगाव कार्यालय येथे निर्माण करावयाच्या पदांचा तपशील

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | उप प्रादेशिक परिवहन अधिकारी | ७४५०-२२५-११,५०० | १ |
| २ | मुख्य लिपिक (ग्रामीण) | ५०००-१५०-८००० | २ |
| ३ | कनिष्ठ लेखा परिक्षक | ५०००-१५०-८००० | १ |
| ४ | स्वच्छक | २,५५०-५५-२६६०-६०-३,२०० | १ |
| ५ | पहारेकरी | २,५५०-५५-२६६०-६०-३,२०० | १ |
| | एकुण | | ६ |

उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,बारामती कार्यालय येथे निर्माण करावयाच्या पदांचा तपशील

| अ.क्र | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | उप प्रादेशिक परिवहन अधिकारी | ७४५०-२२५-११,५०० | १ |
| २ | मोटार वाहन निरीक्षक | ५,५००-१७५-९००० | २ |
| ३ | वाहन चालक | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | १ |
| | एकुण | | ४ |

उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,नवी मुंबई (वाशी) कार्यालय येथे निर्माण करावयाच्या पदांचा तपशील

| | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | उप प्रादेशिक परिवहन अधिकारी | ७४५०-२२५-११,५०० | १ |
| २ | मोटार वाहन निरीक्षक | ५५००-१७५-९००० | २ |
| ३ | पहारेकरी | २५५०-५५-२६६०-६०-३२०० | १ |
| ४ | स्वच्छक | २५५०-५५-२६६०-६०-३२०० | १ |
| | एकुण | | ५ |